सन २०१७-१८ या वित्तीय वर्षासाठी महाराष्ट्र राज्य महिला आयोगास निधी वितरित करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## महिला व बाल विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांक-रामआ-२०१७/प्र.क्र.६२/का-१०

नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख-२३ मे, २०१७.

वाचा :-

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८ एप्रिल, २०१७.

प्रस्तावना :-

वित्त विभागाच्या उपरोक्त संदर्भाधीन परिपत्रकानुसार विधानमंडळाने महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) मंजूर केले आहे. सदर परिपत्रकानुसार सन २०१७-१८ च्या प्रथम नऊमाहीकरीता (डिसेंबर २०१७ अखेर) आवश्यक असणारा योजनेत्तर व योजनांतर्गत अर्थसंकल्पित निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ८० टक्केच्या मर्यादेत सदर प्रणालीद्वारे (बीम्स) वितरित केला जाईल असे वित्त विभागाने कळविले आहे. व त्यानुसार ८०% च्या मर्यादेत बी.डी.एस. प्रणालीवर निधी उपलब्ध करुन दिला आहे.

२. सन २०१७-१८ या वित्तीय वर्षासाठी राज्य महिला आयोगासाठी २२३५-२१६१ या लेखाशिर्षाखाली ३६ सहायक अनुदाने (वेतन) बाबीसाठी ₹२,२७,५२,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी सत्तावीस लक्ष बावन्न हजार फक्त) इतकी अर्थसंकल्पीय तरतूद उपलब्ध करुन देण्यात आली आहे. २२३५-२१६१ या लेखाशिर्षाखाली वित्त विभागाच्या संदर्भाधीन परिपत्रकानुसार वेतन बाबींसाठी उपलब्ध निधी ८०% च्या मर्यादेत आयोगास वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय :-

वित्त विभागाच्या संदर्भाधीन परिपत्रकानुसार सन २०१७-१८ या वित्तीय वर्षासाठी २२३५- २१६१ या लेखाशिर्षाअंतर्गत ८०% च्या मर्यादेत ३६ सहायक अनुदान (वेतन) या बाबीसाठी **₹१,८२,०१,६००/- (अक्षरी रुपये एक कोटी ब्याऐंशी लक्ष एक हजार सहाशे फक्त)** इतका निधी महाराष्ट्र राज्य महिला आयोगास वितरित करण्यास शासन याव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. आयोगाने यापूर्वी उक्त लेखाशिर्षाखाली वितरित केलेल्या संपूर्ण निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे, या अटीच्या अधिन राहून निधी वितरणास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर निधी महाराष्ट्र राज्य महिला आयोगास वितरित करण्यासाठी जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. आहरण व संवितरण अधिकारी यांनी हा निधी महाराष्ट्र राज्य महिला आयोगास वितरीत करावा. तथापि, सदरचा निधी कोषागारातून एकदम आहरित न करता महाराष्ट्र राज्य महिला आयोगाची खर्चाची / निधीची आवश्यकता तपासून जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर (आहरण व संवितरण अधिकारी) यांनी खर्चाचे देयक कोषागारात सादर करावे. जेणेकरुन विनाकरण निधी राज्य महिला आयोगाकडे शिल्लक राहणार नाही, याची दक्षता घ्यावी. तसेच याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्याची दक्षता सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग,मुंबई व आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांनी घ्यावी.

५. सदर रक्कम मागणी क्र.एक्स-१, योजनेत्तर, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाजकल्याण १०३, महिला कल्याण (११) (०१) महाराष्ट्र राज्य महिला आयोगाला अनुदान (२२३५ २१६१) ३६ सहाय्यक अनुदाने (वेतने) या लेखाशीर्षाखाली सन २०१७-१८ मध्ये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या तरतूदीतून खर्च करण्यात यावी.

६. वित्त विभागाच्या दि.१८.४.२०१७ रोजीच्या परिपत्रकानुसार सदर परिपत्रकामध्ये नमूद तपासणी सूची व परिशिष्ट परिच्छेद क्र.७ ते १८ मधील विभागास लागू होणाऱ्या बाबींची पूर्तता होत असल्याने विभागाच्या स्तरावर सदर निधी वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

७. हा शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८ एप्रिल, २०१७ अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०५२३१६३४०३३२३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Milind P Shenoy

Digitally signed by Milind P Shenoy
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Womens And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5a1cf9161e18ca8fa3b7a2263c18944e06f156ba19752cad5615c266d0b4ffb8, cn=Milind P Shenoy
Date: 2017.05.23 16:41:56 +05'30'

**(मि.प.शेणॉय)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

२. सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१.

३. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर

४. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर

५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई

७. उप सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

८. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर

९. कक्ष अधिकारी, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

१०. कक्ष अधिकारी, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

११. मा.सचिव, महिला व बाल विकास विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

१२. कक्ष अधिकारी (का.४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

१३. निवड नस्ती, का-१०.